मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे सुरक्षिततेच्या दृष्टीने
दोन टेहळणी मनोरे [वॉच टॉवर्स] बांधण्यासाठी
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक-एमआयएस-०१९६/१६[६४]/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ७ डिसेंबर १९९८.

वाचा:- १] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-वातअ/मेट-१९९६/कक्ष-३, दिनांक २९.१२.९७.
२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-विअप्र-१०९२/प्र.क्र.११३/९२ विनियम/दिनांक १ जून १९९२.

शासन निर्णय:- मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे कारागृहाची सुरक्षा बळकट करण्यासाठी तसेच सार्वजनिक सुरक्षिततेच्या दृष्टीने दोन टेहळणी मनोरे [वॉच टॉवर्स] बांधण्यासाठी शासनाने प्रशासकीय मान्यता द्यावी, म्हणून कारागृह महानिरीक्षक यांनी प्रस्ताव शासनास सादर केला असून तो प्रस्ताव काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. शासन या आदेशाद्वारे मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे सुरक्षिततेच्या दृष्टीने दोन टेहळणी मनोरे बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. कारागृह महानिरीक्षक यांनी मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे दोन टेहळणी मनोरे बांधण्यासाठी येणारा खर्च रु.६,०५,९००/- इतका प्रस्तावित केला असून हा खर्च १९९९-२००० या आर्थिक वर्षात मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात येणार आहे. तसेच या प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-१०९२/प्र.क्र. १३/९२/विनियम/दिनांक १.६.९२ व वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग पांचच्या अधीनतेने खालील अटींच्या आधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१] यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्राधान्याने हाती घेऊन नंतरच संदर्भाधीन काम हाती घ्यावे.

२] सदर प्रस्तावास आर्थिक तरतूद मंजूर झाल्याशिवाय कामाला सुरुवात करू नये.

३] यासाठी मंजूर केलेल्या अनुदानातूनच बांधकाम पूर्ण करण्यात यावे. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

३. यासाठी होणारा खर्च "लेखाशीर्ष ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-२०१, बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-तुरुंग-मागणी क्रमांक-एच-१५" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सन १९९९-२००० या आर्थिक वर्षात मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग व नियोजन विभाग यांच्या संमतीने वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-५३०/९८/व्यय-८, दिनांक १९.११.९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ ता.स. नाईक ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक [मुख्यालय], महाराष्ट्र राज्य, पुणे.
अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह, मुंबई.
कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, येरवडा पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परिक्षा] मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग [व्यय-८], मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग [का. क्र. १४५५] मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारत-२/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, बीयुडी-१, नवीन प्रशासन भवन, १२ वा मजला.
निवडनस्ती कार्यासन-पीआरएस-५.